राष्ट्रीय कृषि विकास योजनेतंर्गत राज्यातील गुणवत्ता नियंत्रण (खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे व कीटकनाशक चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे ) हा प्रकल्प सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यास प्रशाकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्रमांकः सीपीएस १११५/प्र.क्र.१२४/१७अे

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२

तारीख: १६ सप्टेंबर,२०१५

वाचा

१) शासन पत्र क्र. राकृवि -१११४/प्र.क्र.५८/राकृवियो कक्ष,दिनांक - २३ डिसेंबर २०१४

२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.राखते १०१५/प्र.क्र.६ /१७ अे दि.९ जानेवारी, २०१५

३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृउसप्र/गुनि-६/राकृवियो-२०१५/न.क्र.०१/३०३/२०१५ दि.३०.४.२०१५

४) शासन पत्र क्र. राकृवि ०४१५/प्र.क्र.३८/राकृवियो कक्ष,दिनांक - २५ जून २०१४

प्रस्तावना

राष्ट्रीय कृषि विकास योजनेतंर्गत दिनांक १९ डिसेंबर २०१४ रोजी झालेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समीतीच्या बैठकीत राज्यातील गुणवत्ता नियंत्रण (बीज परिक्षण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे, खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे व कीटकनाशक चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे) व उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे, तपासणी क्षमता वाढविणे व आंतरराष्ट्रीय बीज परिक्षण संस्थेचे इस्टा सभासदत्व व एन.ए.बी.एल. मानांकन प्राप्त करणेसाठी सन २०१४-१५ ते २०१६-१७ या ३ वर्षाकरीता प्रतीवर्षी रक्कम रुपये ३७५.०० लक्ष या प्रमाणे एकूण ११२५.०० लक्ष रकमेचा प्रकल्प राज्यात राबविण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे. त्यानुसार संदर्भ क्र. २ येथील पत्रास अनुसरुन सन २०१४-१५ मध्ये रू. ३७५.०० लक्ष रकमेचा प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. कृषि आयुक्तालयाच्या संदर्भ क्र.३ येथील पत्रास व राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्षाच्या संदर्भ क्र.४ येथील पत्रास अनुसरुन सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेतंर्गत राज्यातील गुणवत्ता नियंत्रणाखालील खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे याकरीता रु.१००.०० लक्ष व कीटकनाशक चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे याकरीता रु. १००.०० लक्ष असा एकुण रु. २००.०० लक्ष रकमेचा प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

## शासन निर्णय :-

राज्यात गुणवत्ता नियंत्रणाखालील खत नियंत्रण प्रयोगशाळा व किटकनाशक प्रयोगशाळांच्या एकूण ९ प्रयोगशाळा कार्यरत आहेत. या प्रयोगशाळांची तपासणी क्षमता वाढविणे, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय मानांकन प्राप्त होणेसाठी, गौण बांधकामे करणे, नवीन तंत्रज्ञानाची अद्यावत उपकरणे

प्रयोगशाळांना उपलब्ध करुन देणे, उपयोगात असलेल्या उपकरणांची देखभाल व दुरुस्ती करणे, प्रमाणित संदर्भिय रसायने, कॉलम, उपकरणे इत्यादी, तसेच , प्रयोगशाळेतील अधिका-यांना उपकरणे हाताळणी तसेच विश्लेषकांचे विश्लेषणाबाबतचे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील अद्यावत प्रशिक्षण देणे इत्यादी, एन.ए.बी.एल. मानांकन प्राप्त करणेसाठी या प्रयोगशाळेत संबंधित संस्थांनी विहित केल्याप्रमाणे सुविधा निर्माण करणे तसेच एन.ए.बी.एल. असेसर ऑडीट शुल्क इत्यादीकरिता सन २०१५-१६ मध्ये रु.२००.०० लक्ष इतक्या रकमेच्या खर्चासह प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मांन्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्पाचे भौतिक व आर्थीक लक्ष्य खालीलप्रमाणे आहे.

**अ) खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे**

| अ.क्र. | बाब | भौतिक लक्ष | आर्थिक लक्ष (रुपये लाख) |
|---|---|---|---|
| १ | गौण बांधकाम, वॉटर प्रुफिंग, नुतनीकरण व इलेक्ट्रीफिकेशन | प्रयोगशाळा ५ | ०४.५० |
| २ | एनएबीएल रजिस्ट्रेशन | प्रयोगशाळा ५ | ०४.५० |
| ३ | विशेष सुट्टे भागाव्दारे उपकरणांची क्षमतावृध्दी करणे, गौण उपकरणे खरेदी करणे, प्रमाणित संदर्भीय रसायने, प्रायमर्स, व्हॅलीडेशन परफॉरमन्स, कॅलीब्रशेन, रेफरन्स बुक, एएमसी, सीएमसी आणि देखभाल इ. | प्रयोगशाळा ५ | ६३.०० |
| ४ | प्रशासकीय खर्च १ टक्का | प्रयोगशाळा ५ | ०१.०० |
| ५ | उपकरण खरेदी (आयुक्तालय स्तर) | प्रयोगशाळा ५ | २७.०० |
| | | एकूण | १००.०० |

**ब) कीटकनाशक चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे**

| अ.क्र. | बाब | भौतिक लक्ष | आर्थिक लक्ष (रुपये लाख) |
|---|---|---|---|
| १ | गौण बांधकाम, वॉटर प्रुफिंग, नुतनीकरण व इलेक्ट्रीफिकेशन | प्रयोगशाळा ४ | १५.८० |
| २ | तपासणी नमुन्यांच्या शिल्लक भागांची विल्हेवाट लावणे. | प्रयोगशाळा ४ | ०३.०० |
| ३ | एनएबीएल नोंदणी शुल्क | प्रयोगशाळा ४ | ०४.०० |
| ४ | विशेष सुट्टे भागाव्दारे उपकरणांची क्षमतावृध्दी करणे, गौण उपकरणे खरेदी करणे, प्रमाणित संदर्भीय रसायने, प्रायमर्स, व्हॅलीडेशन परफॉरमन्स, कॅलीब्रशेन, रेफरन्स बुक, एएमसी, सीएमसी आणि देखभाल इ. | प्रयोगशाळा ४ | ४०.०० |
| ५ | प्रशासकीय खर्च १ टक्का | प्रयोगशाळा ४ | ०१.०० |
| ६ | उपकरण खरेदी (आयुक्तालय स्तर) | प्रयोगशाळा ४ | ३६.२० |
| | | एकूण | १००.०० |

३ प्रस्तुत प्रकल्प राबविण्याकरीता निधी वितरणाची कार्यवाही राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई यांच्याकडून करण्यात येईल.

४. वरील निधी खर्च करण्यास संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय,पुणे यांना सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे संबंधित अधिकाऱ्यांना वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेंचा, आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहीत मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी. तसेच चालू वित्तीय वर्ष संपुष्टात आल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilization Certificate ) न चुकता शासनाला सादर करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१६१५२२४८५२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Akusing Narshi Vasave
Date: 2015.09.16 15:25:49 +05'30'

**( आ.न.वसावे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक
२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४. उपसचिव ( निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व कृषि संचालक /कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
६. कृषि संचालक ( निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, पुणे
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०.वित्त विभाग- (व्यय-१/अर्थसंकल्प -१३)
११.नियोजन विभाग कार्यासन १४३१,
१२.कक्ष अधिकारी (२अे) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष , कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती